**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील विश्रामगृहे / शासकीय कार्यालयाच्या आवारात यापुढे भविष्यात कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारण्यास मनाई करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- साबांज-२०१८/प्र.क्र.३२/मि.व्य.-१,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ ऑक्टोंबर, २०१८.

**शासन निर्णय**

राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील विश्रामगृहे व शासकीय कार्यालयाच्या आवारात पुतळे उभारण्यास जमिन उपलब्ध करुन देण्याबाबतच्या अनेक मागण्या विभागाकडे प्राप्त होतात. सदर मागण्यांचा सांगोपांग विचार करता पुढील गोष्टी निदर्शनास आल्या आहेत :-

१) पुतळयाकरीता मागणी केलेल्या जागेची सद्यस्थितीत जरी आवश्यकता नसली तरी भविष्यात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या एखाद्या प्रकल्पाकरीता अथवा कार्यालयाकरीता जागा आवश्यक असल्यास जागा उपलब्ध होत नाही व त्यावेळी शासनाला खाजगी जागा भाडयाने घ्यावी लागते व त्याचा आर्थिक भुर्दंड शासनाला सोसावा लागतो.
२) यदाकदाचित समाजकंटकाद्वारे पुतळयाची विटंबना झाल्यास कायदा व सुव्यवस्थेला बाधा निर्माण होते. अशावेळी काही गटाच्या भावना दुखावल्या जाण्याचा संभव असतो व त्यामुळे काही वेळा आंदोलनेही केली जातात.
३) सदर पुतळे शासकीय कार्यालयाच्या आवारात असल्याने पुतळयावरुन आंदोलने झाल्यास त्यामुळे शासकीय इमारतींची सुरक्षा धोक्यात येण्याची शक्यता निर्माण होते.

वरील सर्व बाबींचा सांगोपांग विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, राज्य शासनाने यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील विश्रामगृहे/ शासकीय कार्यालयाच्या आवारात कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारण्यास मनाई करण्याचे धोरण स्विकारलेले आहे.

यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील शासकीय कार्यालयाच्या आवारातील जागेवर कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारण्याची मागणी मान्य करता येणार नाही.

हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.सं.क्र.१०/२९, दिनांक ०९.०३.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१२११४९५३००१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Ganpat Amolkar

Digitally signed by Vijay Ganpat Amolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9b318a02c11010fd64b8388360e99c8c5215344dcffab2e51e83ca657ad934a2, serialNumber=abf9a2db008fa8b299e7c58cc513eb8a2cb4ea7441f3ad255a51ae4d3bfdeaa2, cn=Vijay Ganpat Amolkar
Date: 2018.10.12 11:51:52 +05'30'

**( विजय अमोलकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.

३) सर्व मंत्रालयीन विभाग.
४) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व मुख्य अभियंता सा.बां.प्रा.वि.,सर्व अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ
६) सर्व कार्यकारी अभियंता.
७) सर्व विभागीयआयुक्त.
८) सर्व जिल्हाधिकारी.
९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालयातील सर्व अधिकारी व कार्यासने.
११) सा.बां.वि./मिव्य-१.
१२) सा.बां.वि/लेखा परिक्षा सार संग्रहासाठी.
१३) निवड नस्ती/मिव्य-१.